62\D:\PUSHPA\PRS2\AUGUST\013

नांदेड जिल्हा कारागृह येथे रुग्णालयासाठी स्वतंत्र कक्ष बांधण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग

शासन निर्णय क्र. बांधका: ०७२१/प्र.क्र.१०/पीआरएस-२
मंत्रालय, मुंबई ४०००३२, दिनांक:- १९ ऑगस्ट २००३.

पहा - १) कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा प्रस्ताव क्र. बांधकाम/१७५६/३२०/क.३ दिनांक २३.७.२००१

२) वित्त विभाग शा. नि.क्र. विअप्र१०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दिनांक ११.७.२००१

**शासन निर्णय:-** नांदेड जिल्हा कारागृह येथे वैद्यकीय अधिका-याचे पद नसल्यामुळे कारागृहातील बंदी रुग्णांची त्यांच्या तपासणीसाठी नांदेड येथील शासकीय रुग्णालयातील वैद्यकीय अधिकारी आठवड्यातून एकवेळा अथवा दोन वेळा कारागृहात येऊन रुग्णबंद्यांची तपासणी करतात. नांदेड जिल्हा कारागृहात दवाखाण्यासाठी स्वतंत्र अशी खोली नसल्यामुळे तात्पुरती व्यवस्था म्हणुन कार्यालयातील आस्थापना विभागातील खोली मध्येच थोडी जागा उपलब्ध करुन त्यामध्ये सोय केली जाते. परंतु याठिकाणी अधिक जागा नसल्यामुळे औषधांचा साठा करुन ठेवण्यासाठी कपाटे ठेवता येत नाहीत. याशिवाय डॉक्टराना नीट उभे राहून रुग्णबंद्याना तपासता येत नाही व बंद्याना खोलीच्या बाहेरच मोकळया जागेत बसावे लागते. या सर्वबाबींचा विचार करुन नांदेड जिल्हा कारागृह येथे रुग्णालयासाठी स्वतंत्र कक्ष बांधण्यास शासनाने प्रशासकीय मान्यता मंजूर करावी अशी कारागृह महानिरीक्षक यांनी शासनास विनंती केली आहे.

२. नांदेड जिल्हा कारागृह येथे रुग्णालयासाठी स्वतंत्र कक्ष बांधण्यास येणा-या खर्चाचे रु. ४,५४,४२०/- अंदापत्रक व बांधकामाचा नकाशा यास कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नांदेड यांनी प्रमाणीत केले आहे. त्यामुळे सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता द्यावी अशी विनंती कारागृह महानिरीक्षक यांनी केली आहे.

३. नांदेड जिल्हा कारागृह येथे रुग्णालयासाठी स्वतंत्र कक्ष बांधण्यासंबंधीच्या प्रस्तावाचा समावेश केंद्र पुरस्कृत कारागृह सुधारणा योजना (७५:२५) या योजनेत्तर योजनेत केलेला असून त्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबतची बाब काही काळ शासनाच्या विचाराधीन होती. यावर शासनाने काळजीपूर्वक विचार करुन शासन वित्तीय अधिकार नियम पुस्तीका १९७८ भाग पहिला- उप विभाग परिशिष्टातील अनुक्रमांक ४ परिच्छेद क्रं. २७(२) व रकाना ५ व ६ मधील अटींच्या अधिन राहून तसेच वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक विअप्र१०००/प्र.क्र.४६/२००१ विनीमय दिनांक ११..७.२००१ व्दारे मंत्रालयीन प्रशासकीय विभागाना प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकाराचा वापर करुन शासन सदर प्रस्तावास व त्यापोटी येणा-या रु. ४,४९,०००/- ( रुपये चार लक्ष एकोणपन्नास हजार फक्त) च्या खर्चाच्या अंदाजपत्रकास व बांधकामाच्या नकाशास या आदेशाव्दारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

४. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. बी-५ मुख्यलेखाशिर्ष २०५६- तुरुंग- १०१, तुरुंग, केंद्र पुरस्कृत योजना (००) (०१) कारागृह सुधारणा योजना (२०५६-०१८-१) योजनेतर /दत्तमत " या लेखा शिर्षाखाली खर्ची करण्यात यावा. तथापि, यासाठी प्रत्यक्ष अर्थसंकल्पात तरतुद झाल्याशिवाय खर्च करण्यात येऊनचे किंवा बांधकामास सुरवात करु नये.

५. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने तसेच वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र.२०००/प्र.क्र. ४६/२००१ विनियम, दिनांक ११.७.२००१ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या वित्तीय अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

(र.ना. माळी)

कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन , गृह विभाग

प्रति,

कारागृह महानिरीक्षक कारागृह महानिरीक्षणालय, महाराष्ट्र शासन पुणे.

कारागृह महानिरीक्षक ( मुख्यालय) महाराष्ट्र राज्य पुणे.

कारागृह उपमहानिरीक्षक( मध्य विभाग) मध्यवर्ती कारागृह औरंगाबाद

अधिक्षक नांदेड जिल्हा कारागृह , नांदेड

कार्यकारी अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग,नांदेड

महालेखापाल महाराष्ट्र-१ ( लेखा परिक्षा ) ( लेखा व अनुज्ञेयता )मुंबई

महालेखापाल महाराष्ट्र- २ ( लेखा परिक्षा ) ( लेखा व अनुज्ञेयता ) नागपूर

जिल्हा कोषागार अधिकारी/पुणे/ औरंगाबाद व नांदेड

सार्वजनिक बांधकाम विभाग/अथ-२/इमा-२, मंत्रालय, मुंबई

वित्त विभाग (व्यय-८) मंत्रालय, मुंबई

अवर सचिव गृह विभाग बीयुडी-१ मंत्रालय, मुंबई.

निवड नस्ती पीआरएस-२